सन २०१७-१८ व सन २०१८-१९ च्या टंचाई कालावधीत ग्रामीण तसेच नागरी भागात पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ घेण्यात आलेल्या उपाययोजनांवरील खर्च भागविण्यासाठी सन २०१८-२०१९ या वित्तीय वर्षात अनुदान वितरीत करण्याबाबत.

## महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः टंचाई २०१८/प्र.क्र.७३ /पापु-१४

गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल, लोकमान्य टिळक मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीख: २० फेब्रुवारी, २०१९

वाचा :-

१) शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः टंचाई १०९९/प्र.क्र.१२/पापु-१४, दिनांक ३ फेब्रुवारी, १९९९.

२) शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः टंचाई २००८/प्र.क्र.१४९/पापु-१४, दिनांक २१ ऑगस्ट, २००९

३) शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः टंचाई २०१८/प्र.क्र.२१०/पापु-१४, दिनांक १५ डिसेंबर, २०१८

४) शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः टंचाई २०१८/प्र.क्र.२१३/पापु-१४, दिनांक १५ डिसेंबर, २०१८

५) शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः टंचाई २०१९/प्र.क्र.१४/पापु-१४, दिनांक २३ जानेवारी, २०१९

६) शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः टंचाई २०१८/प्र.क्र.२१६/पापु-१४, दिनांक ०२ फेब्रुवारी, २०१९

७) शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः टंचाई २०१९/प्र.क्र.१७ /पापु-१४, दिनांक ०२ फेब्रुवारी, २०१९

८) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांचे पत्र क्रमांक : मजीप्रा/सस/तांशा-४, दिनांक १२ फेब्रुवारी, २०१९

९) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांकः एससीवाय ०८/२०१८/प्र.क्र. ३८/म-११ दिनांक १३ ऑगस्ट, २०१८, दिनांक १७ ऑक्टोबर, २०१८ व दिनांक ३० जानेवारी, २०१९

१०) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः टंचाई २०१८/प्र.क्र.७३/पापु-१४ दिनांक १६ ऑगस्ट, २०१८ , दिनांक २७ ऑगस्ट, २०१८, दिनांक २० ऑक्टोबर, २०१८, दिनांक १६ नोव्हेंबर, २०१८, दिनांक २७ नोव्हेंबर, २०१८ व २ फेब्रुवारी, २०१९.

**प्रस्तावना :-**

राज्यातील ग्रामीण व नागरी भागातील पाणी टंचाई निवारणार्थ घेण्यात येणाऱ्या उपाययोजनांवरील खर्च "२२४५-नैसर्गिक आपत्ती निवारणासाठी सहाय्य" या लेखाशीर्षाखाली उपलब्ध होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात येतो. २०१७-१८ च्या तसेच सन २०१८-१९ च्या टंचाई कालावधीत केलेल्या / करावयाच्या उपायोजनांसाठी संदर्भ क्र. ३-७ मधील शासन निर्णयान्वये टंचाई अंतर्गत उपाययोजनांना प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती . सन २०१८-१९ या वित्तीय वर्षाकरिता महसूल व वन (मदत व पुनर्वसन ) विभागाने संदर्भ क्रमांक ९ च्या शासन निर्णयान्वये निधी या विभागाकडे वर्ग केला आहे. सदर निधी विभागीय आयुक्त, नाशिक, औरंगाबाद व अमरावती आणि सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

ग्रामीण / नागरी भागात पेयजल टंचाई निवारणार्थ शासनाने विहीत केलेल्या निकषानुसार पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ राबविलेल्या/राबविण्यात येणा-या उपाययोजनांवरील खर्च भागविण्यासाठी लेखाशिर्ष २२४५००९३ **अंतर्गत रुपये १३७८.८९ लाख ( अक्षरी रुपये तेरा कोटी अठ्ठयाहत्तर लाख एकोणनव्वद हजार फक्त)** इतका निधी विभागीय आयुक्त, नाशिक, औरंगाबाद व अमरावती आणि सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांना प्रचलित स्थायी शासन निर्णयामध्ये विहीत केलेल्या अटी व शर्ती तसेच खालील अटींच्या अधीन राहून अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे मंजूर व मुक्त करण्यात येत आहे.

१) विभागीय आयुक्त, नाशिक, औरंगाबाद व अमरावती यांनी ग्रामीण भागातील टंचाई अंतर्गत उपाययोजनांसाठीचा निधी संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांना तसेच नागरी भागातील योजनांसाठी आयुक्त, महानगरपालिका / मुख्याधिकारी, नगरपरिषद यांना थेट वितरीत करण्यात यावा.

२) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांनी पिण्याच्या पाण्याच्या टंचाई अंतर्गत महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत राबविण्यात उपाययोजनांसाठीचा निधी संबंधित कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांना वितरीत करण्यात यावा.

३) सन २०१७-१८ व सन २०१८-१९ या टंचाई कालावधीसाठी ग्रामीण / नागरी भागात पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ घेण्यात आलेल्या उपाययोजनांकरीता तसेच या कालावधीतील प्रलंबित देयकांच्या प्रदानासाठी सदर निधी वितरीत करण्यात यावा.

४) ज्या ग्रामीण तथा नागरी उपाययोजनांना टंचाई अंतर्गत शासन स्तरावरुन मान्यता देण्यात आली आहे, त्या योजनांसाठी सदर शासन निर्णयामध्ये नमूद केल्यानुसार योजनेच्या सुरवातीस ५० टक्के व त्यांनंतर ३० टक्के निधी विभागीय आयुक्त यांच्या स्तरावर योजनेची प्रगती आढावा विचारात घेऊन वितरीत करावा, उर्वरित २० टक्के निधी योजना कार्यान्वित झाल्यानंतरच देण्यात यावा.

५) सदर निधी स्वीय प्रपंजी लेखा खाते (Personal Ledger Account ) अथवा बँक खात्यात न ठेवता तो कंत्राटदारांना थेट Electronic Clearing Services द्वारे वितरीत केला जाईल याची दक्षता घ्यावी.

६) ग्रामीण / नागरी भागात पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ सन २०१६-१७ व सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात वितरीत केलेल्या निधीची ज्या जिल्हाधिका-यांकडून उपाययोगिता प्रमाणपत्रे प्राप्त झालेली नाहीत, त्यांनी सन २०१६-१७ व सन २०१७-१८या च्या वर्षांत वितरीत केलेल्या निधीची संपूर्ण खर्चाची (१०० टक्के) उपाययोगिता प्रमाणपत्रे प्राप्त झाली असल्याची खातरजमा झाल्यानंतरच संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांना ग्रामीण उपाययोजनांसाठी निधी वितरीत करावा, तसेच आयुक्त, महानगरपालिका / मुख्याधिकारी, नगरपरिषद यांना नागरी भागासाठी निधी वितरीत करण्यात यावा.तसेच सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांनी सन २०१७-१८ मध्ये टंचाई उपाययोजना अंतर्गत वितरीत केलेल्या निधींची उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर केल्याशिवाय सदर निधी खर्च करण्यात येऊ नये. तसेच सर्व विभागीय आयुक्त आणि सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांनी शासनाकडून सन २०१८-१९ या आर्थिक वर्षामध्ये प्रस्तुत शासन निर्णयापूर्वी प्राप्त झालेल्या निधीची उपयोगिता प्रमाणपत्र दिनांक १० मार्च, २०१९ पूर्वी शासनास सादर करण्यात यावीत.

७) शासन परिपत्रक, वित्त विभाग दि. १८.०४.२०१७ व ३०.०४.२०१७ मधील अटींची पुर्तता ज्या जिल्हयांकडून पूर्ण झाली आहे. त्याच जिल्हयांना निधी वितरीत करण्यात यावा.

८) निधीचे वितरण करतांना यापूर्वी संबधित उपाययोजनांना निधी वितरित करण्यात आलेला नाही याची खातरजमा करावी.

९) यापुढे टंचाई निवारणार्थ घ्यावयाच्या उपाययोजनांकरिता निधीची मागणी करतांना, टंचाई निवारणार्थ कोणत्या प्रस्तावित उपाययोजना कोणत्या कालावधीसाठी घ्यावयाच्या आहेत, त्यासाठी किती निधीची

आवश्यकता आहे याबाबत बाब निहाय मागणी तसेच चालू आर्थिक वर्षात वितरीत करण्यात आलेला निधी, झालेला खर्च, शिल्लक निधी इत्यादि बाबतची माहिती, तसेच त्याबाबतची उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्यात यावीत. त्याशिवाय भविष्यात निधी मंजूर केला जाणार याची नोंद घेण्यात यावी.

१०) ज्या प्रयोजनासाठी निधी वितरीत करण्यात आला आहे, त्याबाबतची जिल्हानिहाय भौतिक प्रगतीची माहिती विभागीय आयुक्तांनी शासनाकडे दर महिन्यास मासिक खर्चाच्या अहवालासोबत सादर करावी. निधीच्या वाटपाचे लेखे, अभिलेख विहीत कार्यपद्धतीनुसार अनुदान आहरीत व वितरीत करणा-या कार्यालयाच्या स्तरावर अद्ययावत ठेवण्यात यावे. त्याचप्रमाणे दरमहा होणा-या प्रत्यक्ष खर्चाची माहिती पुढील महिन्याच्या ५ तारखेपर्यंत एकत्रितरित्या शासनास सादर करावी. दर तीन महिन्यांनी झालेल्या खर्चाची, महालेखाकार कार्यालयात नोंदविण्यात आलेल्या खर्चाशी पडताळणी करुन त्याबाबतचे विहीत प्रमाणपत्र या विभागाकडे तात्काळ सादर करावे. तसेच **कोणत्याही परिस्थितीत मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही** याची दक्षता नियंत्रक अधिका-याने घ्यावी. वितरीत करण्यात आलेल्या अनुदानातून जर काही रक्कम खर्ची पडणार नसेल तर ती रक्कम विहीत वेळेत शासनास प्रत्यार्पित करण्यात यावी.

११) सदर निधी सन २०१८-१९ या आर्थिक वर्षातच खर्च होणे आवश्यक आहे.तो व्यपगत होणार नाही अथवा कोषागारातून आहरित करून बँक खात्यात काढून ठेवला जाणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

१२) **याबाबतचा खर्च या शासन निर्णयातील निधी वितरण बाबतच्या विवरणपत्रात नमूद केल्याप्रमाणे "मागणी क्र. सी-६, २२४५ -नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य, ०१-अवर्षण, १०२-पिण्याच्या पाण्याचा पुरवठा, (९१)-राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च, (९१) (०१) पिण्याच्या पाण्याचा आकस्मिक निकडीचा पुरवठा (२२४५ ००९३) (दत्तमत)(वेतनेत्तर) ३१, सहायक अनुदाने" या उपलेखाशीर्षा उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागवावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.**

१३) आहरण व संवितरण अधिका-यांनी कोषागार / उप कोषागार अधिकारी यांच्याकडे पाठविण्यात येणा-या व देयकासोबत जोडल्या जाणा-या संगणक स्लीपमध्ये गौण / उपलेखाशीर्षाचा संगणक संकेतांकाचा न चुकता उल्लेख करावा. तसेच, कोषागारातून/ उपकोषागारातून आहरीत केलेल्या रकमेचा अहवाल शासनास सादर करावा.

या शासन निर्णयान्वये करण्यात येणाऱ्या निधी वितरणाचा तपशील खालीलप्रमाणे आहे. याप्रमाणेच विभागीय आयुक्तांनी तसेच सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांनी सर्व संबंधितांना खालीलप्रमाणे तात्काळ निधी वितरीत करावा.

| अ.क्र. | विभागीय आयुक्त / म.जी.प्रा. | शासनाकडून निधी वितरित करण्यात येणाऱ्या योजनांची नावे | रक्कम रुपये लाखात | एकूण रुपये लाखात |
|---|---|---|---|---|
| १ | **महाराष्ट्र जीवन प्राधिकरण** | १. लासूर स्टेशन व १३ गावे पाणी पुरवठा योजना, जि. औरंगाबाद. (५० टक्केच्या अनुषंगाने उर्वरित निधी) | **१३१.५१** | |
| | | २. खुलताबाद शहर व इतर २० गावे तातडीची पाणी पुरवठा योजना ता. खुलताबाद, जि. औरंगाबाद. | **५९१.२०** | |
| | | ३. निमगाव केतकी पाणी पुरवठा योजना, ता. इंदापूर, जि.पुणे. | **५९.५३** | **७८२.२४** |
| २. | **नाशिक** | मौ. पाळधी तात्पुरती पुरक नळ पाणी पुरवठा योजना, ता. जामनेर, जि. जळगाव. | **२२.०१** | |
| | | अहमदनगर जिल्हयातील योजना प्रादेशिक पाणी पुरवठा योजनांची विशेष दुरुस्ती.<br>१. तळेगांव दिघे व १९ गावे, ता. संगमनेर,<br>२. गळनिंब शिरसगाव व १८ गावे, ता. नेवासा,<br>३. मिरी तीसगाव व २२ गावे, ता. पाथर्डी,<br>४. शेवगाव पाथर्डी व ५४ गावे, ता. शेवगाव,<br>५. बोधेगाव व ०७ गावे, ता. शेवगाव,<br>६. बुऱ्हाणनगर व ४४ गावे, ता. अहमदनगर | **४१३.४९** | **४३५.५०** |
| **३.** | **औरंगाबाद** | मौजे ढाकेफळ व ५ गावे, ता. पैठण, जि. औरंगाबाद. | **४५.१२** | **४५.१२** |
| ४. | **अमरावती** | १. नगरपरिषद देऊळगावराजा शहर तातडीची पाणी पुरवठा योजना, जिल्हा बुलडाणा | ८१.०४ | |
| | | २.नगरपरिषद सिंदखेडराजा शहर तातडीची पाणी पुरवठा योजना, जिल्हा बुलडाणा | **३४.९९** | **११६.०३** |
| | **एकूण रु.** | | **१३७८.८९** | **१३७८.८९** |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१९०२२०१४५६३१६४२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

R. B. Kumatgi

Digitally signed by R. B. Kumatgi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=WSSD Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=96d578360190574be078f90f44cde8446df6e461003bf3672f18f9dbab1603da, cn=R. B. Kumatgi
Date: 2019.02.20 17:39:43 +05'30'

**( राजेंद्र कुमटगी )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
२. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
३. प्रधान सचिव (२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव (ग्रा.वि.), ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
५. सचिव, महसूल (मदत व पुनर्वसन) विभाग, मंत्रालय मुंबई.
६. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई,
७. महालेखाकार, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
८. महालेखाकार, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर
९. विभागीय आयुक्त, नाशिक, औरंगाबाद व अमरावती
१०. जिल्हाधिकारी , पुणे, औरंगाबाद, बुलडाणा, जळगांव व अहमदनगर
११. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, ,नाशिक औरंगाबाद, बुलडाणा, जळगांव व अहमदनगर
१२. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद नाशिक औरंगाबाद, बुलडाणा, जळगांव व अहमदनगर
१३. मुख्याधिकारी, नगर परिषद खुलताबाद जि. औरंगाबाद, देऊळगांवराजा, जि. बुलडाणा सिंदेखेडराजा, जि. बुलडाणा
१४. मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१५. मा. राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१६. अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१७. उप सचिव / पापु-१४, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहायक
पापु-१४ संग्रहासाठी.